

हिंगोली जिल्ह्यातील वसमत तालुक्यातल्या रिधोरा या गावी १९६२ साली जन्मलेल्या इंद्रजित भालेराव यांचे शालेय शिक्षण रिधोरा, आहेरवाडी, हयातनगरसारख्या खेड्यातून चिखल-काट्याचा रस्ता तुडवत झालेले आहे. महाविद्यालयीन शिक्षण वसमतच्या बहिर्जी स्मारकमधून तर विद्यापीठीय शिक्षण औरंगाबादमधून झालेले आहे. एम. ए. च्या परीक्षेत त्यांनी विद्यापीठाचे सुवर्णपदक मिळवले आहे.

इंद्रजित भालेराव हे सध्या परभणीचे रहिवाशी असून वरिष्ठ महाविद्यालयात मराठीचे अध्यापन करतात. 'पीकपाणी' या १९८९ साली प्रकाशित झालेल्या पहिल्याच कवितासंग्रहाने त्यांना मोठी मान्यता मिळवून दिली. 'दूर राहिला गाव', 'आम्ही काबाडाचे धनी', 'कुळंबीणीची कहाणी', 'पेरा' या नंतरच्या कवितासंग्रहांनाही राजमान्यता, रसिकमान्यता आणि समीक्षकांचीही मान्यता मिळत गेली. शालेय अभ्यासक्रमापासून विद्यापीठापर्यंत त्यांच्या कविता आणि संग्रह अभ्यासासाठी नेमण्यात आलेले आहेत. राज्य पुरस्कारापासून शेतकरी पुरस्कारापर्यंत अनेक पुरस्कार त्यांच्या लेखनाने पटकाविले आहेत.

कवितावाचनाच्या आपल्या आगळ्यावेगळ्या शैलीमुळे त्यांनी प्रचंड लोकप्रियता मिळविली आहे. महाराष्ट्राबाहेरही त्यांचे काव्यवाचनाचे कार्यक्रम लोकप्रिय ठरले आहेत.

'गाई घरा आल्या', 'लळा', 'भिंगुरवाणा' ही ललित गद्याची पुस्तके प्रसिद्ध असून संत जनाबाई व बहिणाबाई चौधरी यांच्यावरचे आस्वादपर लेखन आणि आता ताराबाई शिंदे यांच्यावरचे लेखन प्रसिद्ध होत आहे. बी. रघुनाथ यांच्या समग्र वाङ्मयाचे संपादन त्यांनी केले असून संपादन आणि ललित गद्यलेखनाचेही राज्य पुरस्कार त्यांना मिळाले आहेत.